दिनांक १७.५.२०१७ च्या शासन निर्णयाचा पुनर्विचार करून रात्रशाळांबाबत परिपूर्ण धोरण निश्चित करण्यासाठी समितीची स्थापना करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

### शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०२२/प्र. क्र. ४/टीएनटी-१

चौथा मजला, खोली क्र. ४४०, विस्तार इमारत,
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई- ४०० ०३२
तारीख: १७ जानेवारी, २०२२

**वाचा :-**

१) **शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१६/प्र. क्र.५८/टीएनटी-१, दिनांक १७.५.२०१७**
२) **शासन शुद्धीपत्रक क्रमांकः संकीर्ण-२०१६/प्र. क्र. ५८/टीएनटी-१, दिनांक ८.६.२०१८**

**प्रस्तावना :-**

रात्रशाळेतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचा-यांच्या सेवाविषयक बाबी, रात्रशाळेची संचमान्यता इत्यादी बाबींच्या संदर्भात संदर्भ-१ मधील शासन निर्णय पारित करण्यात आला आहे. तथापि, शासन निर्णय दिनांक १७.५.२०१७ मधील काही तरतूदी, महाराष्ट्र खाजगी शाळांतील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) नियमावली, १९८१ मधील तरतूदींशी विसंगत असल्याचे निदर्शनास आल्याने तसेच सन २०21 च्या तृतीय अधिवेशनात उपस्थित करण्यात आलेल्या लक्षवेधी सूचना क्र. ४०५ वर झालेल्या चर्चेच्या अनुषंगाने शासन निर्णय दिनांक १७.५.२०१७ चा पुनर्विचार करून रात्रशाळांबाबत परिपूर्ण धोरण निश्चित करण्यासाठी उच्च स्तरीय समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

शासन निर्णय दिनांक १७.५.२०१७ चा पुनर्विचार करून रात्रशाळांबाबत परिपूर्ण धोरण निश्चित करण्यासाठी खालील प्रमाणे समितीची स्थापना करण्यात येत आहे-

१. अध्यक्ष - मा. मंत्री, शालेय शिक्षण विभाग
२. उपाध्यक्ष - मा. राज्यमंत्री, शालेय शिक्षण विभाग
३. सदस्य -
   १) मा. श्री. विक्रम काळे, वि. प. स.
   २) मा. श्री. कपिल पाटील, वि. प. स.
   ३) मा. श्री. विलास पोतनीस, वि. प. स.
   ४) मा. श्री. ज. दि. आसगावकर, वि. प. स.
   ५) अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
   ६) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
   ७) श्री. इ. मु. काझी, सह सचिव, शालेय शिक्षण
४. सदस्य सचिव - उप सचिव (टीएनटी)

२. समितीची कार्यकक्षाः-

i. दिनांक १७.५.२०१७ च्या शासन निर्णयाचा पुनर्विचार करणे.
ii. रात्रशाळांबाबत परिपूर्ण धोरण निश्चित करणे.

३. समितीने सदर प्रकरणी आवश्यक तेवढ्या बैठका/ सुनावण्या घेऊन रात्रशाळांबाबत सर्वंकष अभ्यास करून समिती आपल्या शिफ़ारशी आठ आठवड्यांमध्ये शासनास सादर कराव्यात.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०११७१५५०४८७५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVIN RAJARAM MUNDHE

Digitally signed by PRAVIN RAJARAM MUNDHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8cc298cb2ba38f035e6bd1a51789c7ed1ed4f4fce865eda3495969f77d97c89a, pseudonym=8A56BA47E80DB19230A0A19F1AC94146E6B7B8A8, serialNumber=DC78036626EC580D66C0AC502D43AF5F670B5BA13F51213AD071ACD53714A284, cn=PRAVIN RAJARAM MUNDHE
Date: 2022.01.17 15:53:26 +05'30'

**( प्रविण मुंढे )**
अवर सचिव, महाराष्ट्र राज्य

**प्रत,**

१. मा. मंत्री, शालेय शिक्षण विभाग यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री, शालेय शिक्षण विभाग यांचे खाजगी सचिव
३. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सचिव
४. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
५. निवड नस्ती, कार्यासन टीएनटी-१.